राष्ट्रीय स्तरावरील कौशल्य विकास कार्यक्रम अंतर्गत "मॉडयुलर एम्प्लॉएबल स्किम" या योजनेसाठी केंद्र शासनाने मंजूर केलेला रु.६१४.४६ लाखाचा निधी वितरीत करण्यांबाबत...

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासा निर्णय क्र.पूरक-२०११/(३७/११)/व्यशि-२

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: १ नोव्हेंबर, २०११.

संदर्भ :- १) शासन निर्णय क्र.आयटीआय-२००८/(२६४/०८)/व्यशि-२, दिनांक १३ ऑगस्ट २००८.

२) शासन निर्णय क्र.कौविका-२०११/(१९/११)/व्यशि-५, दिनांक २८ फेब्रुवारी २०१०.

३) शासन निर्णय क्र.कौविका-२०१०/(१७७/१०)/व्यशि-५, दिनांक २९ डिसेंबर २०१०.

४) डि.जी.ई.टी., नवी दिल्ली यांचे पत्र क्र. DGET-7/2/2010-MES/IS, दिनांक २९/१२/२०१० व दिनांक २९/३/२०११.

५) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे पत्र क्र. १८/एमईएस/२०११/ २५६, दिनांक २७/५/२०११.

**प्रस्तावना:-** मा.पंतप्रधानाच्या अध्यक्षतेखालील "राष्ट्रीयस्तरावरील कौशल्य विकास योजना" या योजनेचं धोरण निश्चित करण्यासाठी राष्ट्रीय विकास कौशल्य परिषदेची स्थापना करण्यात आलेली आहे. या परिषदेचे सन २०२२ पर्यंत ५०० दशलक्ष कुशल मनुष्यबळ निर्माण करण्याचे उद्दिष्ट आहे. संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये सदरचा कार्यक्रम राज्यात राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. ही योजना केंद्र पुरस्कृत असून त्यासाठी १००% अनुदान केंद्र शासनाकडून प्राप्त होते. या योजने अंतर्गत इलेक्ट्रिकल, इलेक्ट्रॉनिक्स, ऑटोमोबाईल, रिटेल, पर्यटन, माहिती व तंत्रज्ञान, कृषि, रसायन, बँकिंग, अकौंटिंग, विमा, टेक्स्टाईल, हॉस्पिटॅलिटी, फॅब्रिकेशन, गारमेंट मेकिंग इत्यादी विविध ६१ क्षेत्रातील सुमारे १४०० अभ्यासक्रम तयार करण्यात आलेले आहेत. शालेय शिक्षणातून गळती झालेले विद्यार्थी, कारखान्यात / औद्योगिक आस्थापनेत काम करीत असलेले अकुशल कामगार / औ.प्र.संस्थेतील विद्यार्थी, महिला व इत्यादींच्या रोजगार क्षमता

वाढविण्यासाठी विविध व्यवसायाचे प्रशिक्षण देणे हे या योजनेचे उद्दिष्ट आहे. या योजनेतुन शासकीय / अशासकीय व्यवसाय शिक्षणाचे प्रशिक्षण देणाऱ्या संस्थांना परिक्षा शुल्क व प्रशिक्षण शुल्क तसेच विद्यार्थ्यांचे मुल्यमान करणाऱ्या संस्थांना (Assessing Body) अनुदानाची केंद्र शासनाने ठरविलेल्या दरानुसार खर्चाची प्रतिपूर्ती करण्यात येते. या खर्चाची प्रतिपूती प्रथम केंद्र शासनाकडून परस्पर रिजनल डायरेक्टर ऑफ अॅप्रेंटिसशिप, सायन या संस्थेमार्फत संबंधित संस्थांना करण्यात येत होती. केंद्र शासनाने या योजनेच्या निधी वितरणाच्या कार्यपध्दतीत बदल केला असून संदर्भ क्रमांक ४ अन्वये आता हा निधी राज्य शासनाच्या सुपूर्द केला आहे. सदरहू निधी राज्यस्तरावरील "State Management Committee of Skill Development" या नोंदणीकृत सोसायटीच्या खात्यामध्ये जमा करण्यात येणार असून सोसायटीमार्फत हा निधी संबंधित शासकीय / अशासकीय संस्थांना अदा करण्यात येणार आहे.

संदर्भ क्रमांक ४ अन्वये या योजनेसाठी केंद्र शासनाकडून सन २००९-१० व २०१०-११ या आर्थिक वर्षात शासकीय व अशासकीय संस्थांनी केलेल्या खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी एकूण रु.६,१४,४६,८००/- (रुपये सहा कोटी चौदा लाख सेहचाळीस हजार आठशे फक्त) इतका निधी राज्य शासनास प्राप्त झाला आहे. हा निधी संबंधित शासकीय व अशासकीय संस्थांना उपलब्ध करुन देण्यासाठी जुलै २०११ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसकंल्पित करण्यात आला होता.

**<u>शासन निर्णय</u>:-** उपरोक्त प्रस्तावनेच्या अनुषंगाने राष्ट्रीयस्तरावरील कौशल्य विकास कार्यक्रमा अंतर्गत "मॉडयुलर एम्प्लॉएबल स्किम" या योजनेसाठी केंद्र शासनाने राज्य शासनास मंजूर केलेला रु.६,१४,४६,८००/- (रुपये सहा कोटी चौदा लाख सेहचाळीस हजार आठशे फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. संदर्भ क्रमांक २ मधील शासन निर्णयामध्ये नमुद करण्यात आलेल्या अटींच्या अधीन राहून हा निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

प्रस्तावा अंतर्गतचा खर्च "मागणी क्रमांक डब्ल्यु-४, २२३०-कामगार व सेवायोजन, ०३-प्रशिक्षण, १९९-इतर शासकीय संस्थांना सहाय्य, ०१-स्किल डेव्हलपमेंट मिशन, ०१-कौशल्य विकासाकरीता राज्य व्यवस्थापन समिती, ३१-सहाय्यक अनुदाने (जनरल) (२२३० ५८५५)" या लेखाशिर्षाखली सन २०११-१२ या आर्थिक वर्षात उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदरचा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५४९/११/ व्यय-५, दिनांक १२/१०/२०११ अन्वये प्राप्त मान्यतेनंतर निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.**२०११११०११५१२५२००१** आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सं. अ. बागेश्वर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
सचिव, श्रम व रोजगार मंत्रालय, श्रमशक्ती भवन, भारत सरकार, नवी दिल्ली.
सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहसंचालक / उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नागपूर / अमरावती / औरंगाबाद / नाशिक [व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचेमार्फत]
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व आज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
लेखा व अनुदान अधिकारी कार्यालय, मुंबई. [व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचेमार्फत]
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी. [व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचेमार्फत]
नियोजन / वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन व्यशि-१,३,४,५
निवड नस्ती/व्यशि-२